**शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचे सन २०१७-१८ या वर्षाचे कार्यमूल्यमापन अहवाल लिहिण्याची कार्यवाही पुर्ण केल्याचे प्रमाणपत्र माहे जूलै-२०१८ च्या वेतनदेयकाच्या मंजुरीसाठी अनिवार्य न समजण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.१२६/२०१८/कोषा प्रशा-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.७
तारीख: २१ ऑगस्ट, २०१८.

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक :सीएफआर १२११ / प्र.क्र.२१७/१३, दिनांक १७ डिसेंबर, २०११

२) शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण१०.१३/प्र.क्र.५५/कोषा प्रशा-५, दिनांक १२ सप्टेंबर, २०१३.

३) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक :सीएफआर १२११/ प्र.क्र२५७/ तेरा, दिनांक २ फेब्रुवारी,२०१७

४) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक :सीएफआर १२११ / प्र.क्र. २५७ /तेरा, दिनांक ७ फेब्रुवारी,२०१८.

**शासन परिपत्रक**

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल दरवर्षी कॅम्प घेऊन लिहिण्याची कार्यपध्दती उपरोक्त संदर्भ क्र.१,३ व ४ च्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये विहित केलेली आहे. या शासन निर्णयातील तरतुदीनुसार दरवर्षी राज्यभरातील सर्व शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहून, त्याचे संस्करण करण्याची कार्यवाही दि.३० जूनपर्यंत पुर्ण होणे बंधनकारक आहे. गोपनीय अहवाल विहित वेळापत्रकानुसार लिहिण्याची जबाबदारी पार न पाडणाऱ्या प्रतिवेदन व पुनर्विलोकन अधिकाऱ्याची त्या वर्षातील दिनांक ०१ जुलै रोजी देय होणारी वार्षिक वेतनवाढ मंजूर न करण्याबाबतच्या सूचना या विभागाच्या दिनांक १२ सप्टेंबर, २०१३ च्या शासन परिपत्रकानुसार देण्यात आलेल्या आहेत.

२. गट अ,ब(राजपत्रित), ब(अराजपत्रित) व क संवर्गातील अधिका-यांचे कार्यमूल्यमापन अहवाल महापार सन २०१७-१८ पासून ऑनलाईन प्रणालीत नोंदविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तथापि कार्यमूल्यमापन अहवाल ऑनलाईन पध्दतीने लिहिण्यासाठी सुरु केलेल्या महापार प्रणालीमध्ये काही तांत्रिक अडचणी निर्माण झाल्या आहेत. सदर अडचणींचे निराकरण करुन महापार प्रणाली कार्यान्वित होण्यास विहित मुदतीपेक्षा जास्त कालावधी लागणार आहे.

३. कार्यमूल्यमापन अहवाल ऑनलाईन पध्दतीने लिहिण्यासाठी सुरु केलेल्या महापार प्रणालीत निवडक १२ सेवांव्यतिरिक्त अन्य सेवांचाही टप्प्याटप्प्याने समावेश करण्यात येणार आहे. सन २०१८-१९ मध्ये सदर सेवांचा समावेश केल्यास ६०,००० शासकीय अधिकारी या प्रणालीत समाविष्ट होणार आहेत. त्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल विहित कालावधीत भरणे शक्य होणार नाही.

प्रस्तुत कारणांस्तव शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे सन २०१७-१८ या वर्षाचे कार्यमूल्यमापन अहवाल विहित वेळेत लिहून पूर्ण करता आलेले नाहीत. संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचे जुलै, २०१८ च्या वेतनाचे (वार्षिक वेतनवाढीसह) देयक सादर करण्यासाठी प्रशासकीय विभागांस अडचणी येत आहेत.

४. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता, अधिदान व लेखा अधिकारी, सर्व कोषागारे व उपकोषागारे तसेच सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांना सूचित करण्यात येते की, **जुलै, २०१८ च्या देयकात "गोपनीय अहवाल लिहिण्याची कार्यवाही पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र" पुढील सूचना मिळेपर्यंत वेतन देयकाच्या मंजूरीकरीता अनिवार्य समजण्यात येऊ नये**.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०८२३१६४८४७७१०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2018.08.23 16:51:01 +05'30'

**(अनुदिप दिघे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३. राज्यपालांचे सचिव
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई

१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२७. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
२९. सह संचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१. निवड नस्ती कोषा प्रशा. ५